**<u>प्रशासकीय मान्यता-</u>**
निफाड, जि.नाशिक येथील न्यायालयात
पक्षकारांकरीता शेडचे बांधकाम करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीसीबी २५०६/५१०/(प्र.क्र.१५/०६)-का.१३.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि.३१ ऑक्टोबर,२००७.

**पहा :-** १) अपर प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू) ६०४७/१९८६, दि.२ मार्च, २००६.
२) जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांचे पत्र क्र.बिल्डींग/६५९९/२००५, दि.२२ जून, २००५.

**<u>शासन निर्णय</u>** :- निफाड, जि.नाशिक येथील न्यायालयात पक्षकारांकरिता शेडचे बांधकाम करण्यासाठी येणारा खर्च रु.१,५९,१०६/- (रु.एक लक्ष एकोणसाठ हजार एकशे सहा फक्त) इतक्या अंदाजित खर्चास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **<u>अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.</u>**

३. हे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,

जिल्हा व सत्र  न्यायाधीश, नाशिक,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक,  महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक
(मुळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय  अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, निफाड
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
उप कोषागार अधिकारी, नाशिक,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.